**नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या आस्थापनेवरील वर्जित प्रयोजनांतर्गत मंजूर असलेल्या अधिकाऱ्यांकरिता निर्लेखित वाहनांच्या बदल्यात नविन वाहने खरेदी करण्यास मान्यता देण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग,**
**शासन निर्णय क्र.टिपीव्ही-२०१२/१२२/प्र.क्र.३८/नवि-२७,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
चौथा मजला, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
**दिनांक :- २० एप्रिल, २०१७.**

वाचा :- १) नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालयाचे / संचालक, नगर रचना, पुणे यांचे कार्यालयाचे पत्र क्र.आस्था/ वाहन खरेदी/ प्रशा-२/६०९, दि.०२.०१.२०१२. व क्र.आस्था/वाहन खरेदी/प्रशा-२/१५२६, दि.१८.०३.२०१७.

२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.वाहन-२०१६/प्र.क्र.५१/१६/विनियम, दि.२१.०१.२०१७.

**प्रस्तावना :-**

नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, मुख्य कार्यालय, पुणे व त्यांच्या अधिनस्त क्षेत्रिय कार्यालयांकडील वाहनांचा दि.१८.०१.२००८ रोजी सर्वंकष आढावा घेण्यात आला आहे. राज्यस्तरीय वाहन आढावा समितीने सदरहू आढावा मंजूर केला असून, संचालनालयाच्या आस्थापनेवरील २३ अधिकाऱ्यांना वर्जित प्रयोजनार्थ मान्यता दिलेली आहे. सद्यस्थितीत, वर्जित प्रयोजनातील ज्या ०७ अधिकाऱ्यांकरिता वाहने उपलब्ध नाहीत, त्या अधिकाऱ्यांना निर्लेखित केलेल्या ०७ वाहनांच्या बदल्यात नविन ०७ वाहने खरेदी करण्यास राज्यस्तरीय वाहन आढावा समितीने मान्यता दिलेली आहे. त्यानुसार नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालयाच्या आस्थापनेवरील वर्जित प्रयोजनातील अधिकाऱ्यांना नविन सात वाहने खरेदी करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत पुढीलप्रमाणे शासन आदेश देण्यात येत आहेत :-

**शासन निर्णय :-**

नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालयाच्या आस्थापनेवरील वर्जित प्रयोजनात मंजूर असलेल्या व वाहने उपलब्ध नसलेल्या अधिकाऱ्यांकरिता ०७ निर्लेखित वाहनांच्या बदल्यात नविन ०७ वाहने विहित कार्यपद्धतीचा अवलंब करुन तसचे वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि.२१.०१.२०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये वाहन खरेदी करिता निश्चित केलेल्या किंमत मर्यादेत [प्रति वाहन रु.६,००,०००/- (अक्षरी रुपये सहा लाख फक्त) वाहनांची किमंत + विक्रीकर + टेंम्प्ररी रजिस्ट्रेशन चार्जेस + मूल्यवर्धित कर + सहाय्यभुत साहित्य {Accessories} इत्यादी अंतर्भूत करुन] खरेदी करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

०२. सदरचा खर्च मागणी क्र.एफ-२, २२१७-नगरविकास, (००) (०३) संचालक, नगररचना यांची शाखा कार्यालये दत्तमत (२२१७ ०१३६), १३, कार्यालयीन खर्च या लेखाशीर्षाखाली वित्तीय वर्ष **सन २०१७-१८** करिता मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

०३. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि.१७.०४.२०१५ सोबतचे परिशिष्ट, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग दोन, अ.क्र.१९ ब, नियम क्र.६९ समोरील स्तंभ ६ खालील अटी व शर्तींचे पालन करण्यात यावे.

०४. सदरचे ज्ञापन वित्त विभाग, शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दि.१७.०४.२०१५ सोबतचे परिशिष्ट, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग दोन, अ.क्र.१९ ब, नियम क्र.६९ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारान्वये व वित्त विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र.८२/विनियम, दि.२५.०३.२०१७ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

०५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक **२०१७०४२०१११४४६६२२५** असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने सांक्षाकिंत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Eknath Kisan Sahane

Digitally signed by Eknath Kisan Sahane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c2f7e29994246b598ed0f72234360bb639afd8fae26e0e7238d80dcb921ce52a, cn=Eknath Kisan Sahane
Date: 2017.04.21 16:51:54 +05'30'

**( ए. कि. सहाणे )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

**संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे. (०३-प्रती).**

**प्रत माहिती व आवश्यक त्या कार्यवाहीस्तव :-**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.
३. महालेखापाल (लेखा परिक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.
४. महालेखापाल (लेखा परिक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.
५. अपर मुख्य सचिव (व्यय) तथा अध्यक्ष, राज्यस्तरीय वाहन आढावा समिती, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव (लेखा व कोषागारे), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. प्रधान सचिव (परिवहन), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
९. उप सचिव (विनियम), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. उप सचिव (व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

११. उप सचिव (अर्थसंकल्प), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. कार्यासन अधिकारी (नवि-८), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१४. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, नागपूर.
१५. मा. प्रधान सचिव (नवि-१) यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
१७. निवडनस्ती / नवि-२७.

*****